**शिर्डी शहराच्या साफसाफाईची कामे ठोक पध्दतीने करण्यासाठी श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचेकडून शिर्डी नगरपंचायतीस अनुदान उपलब्ध करुन देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन शुध्दीपत्रक क्र. सासंवि -१०१८/१७९/प्र.क्र.२०/का.१६**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २२ नोव्हेंबर, २०१८.

संदर्भ:- १) विधी व न्याय विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय दि. ७.०४.२०१८.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएसटी/वशी-लेखा-अनुदान/११३६/२०१८,दि.०१ जून, २०१८.
३) विधी व न्याय विभागाचे समक्रमांकाचे शासन शुध्दीपत्रक दि. १७.१०.२०१८.

**शासन शुध्दीपत्रक:-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक ३, दि. १७.१०.२०१८ रोजीच्या शासन शुध्दीपत्रकातील परिच्छेद क्र.१ खालीलप्रमाणे आहे :-

" श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) अधिनियम, २००४ मधील कलम २१ (२) (दोन) मधील तरतुदीनुसार श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था येथील छाननी समितीने मान्यता दिल्याप्रमाणे शिर्डी नगरपंचायतीच्या हद्दीअंतर्गत येणाऱ्या परिसरातील दैनंदिन स्वच्छताविषयक साफ सफाईची कामे ठोक पध्दतीने करण्यासाठी श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्याकडून शिर्डी नगरपंचायत, शिर्डी यांना दि. ०१.१२.२०१७ पासून दरमहा रु. ४२,५१,५९९/- इतका निधी पुढील पाच वर्षांसाठी अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे "

**याऐवजी**

" श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) अधिनियम, २००४ मधील कलम २१ (२) (दोन) मधील तरतुदीनुसार शिर्डी नगरपंचायतीच्या हद्दीअंतर्गत येणाऱ्या परिसरातील दैनंदिन स्वच्छता विषयक साफ सफाईची कामे ठोक पध्दतीने करण्यासाठी श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्याकडून शिर्डी नगरपंचायत, शिर्डी यांना दि. ०१.१२.२०१७ पासून दरमहा रु. ४२,५१,५९९/- इतका निधी पुढील पाच वर्षांसाठी अनुदान स्वरुपात उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे." असे वाचण्यात यावे.

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्यांचा संकेतांक २०१८१२०११२१८५८१६१२ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2018.12.01 12:26:05 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
**कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.**

**प्रति:-**

१) मा अध्यक्ष, श्रीसाईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी.

२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३) मा.राज्यमंत्री, विधि व न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,

४) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्रीसाईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी.

५) निवड नस्ती/का.१६.